**आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (IFAD)**
**सहाय्यीत समन्वित कृषि विकास प्रकल्पाकरिता**
**निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -बजेट-०३१०/प्र.क्र.५१ /२१स**
**मंत्रालय विस्तार,मुंबई-४०००३२**
**दिनांक : ३०/०३/२०११**

**वाचा :** १. शासन निर्णय क्र. बासप्र-२००८/प्रक्र.४८/२१-स, दि.१३ ऑगस्ट, २००९.
२. प्रकल्प संचालक, समन्वयीत कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांच्याकडून प्राप्त प्रस्ताव क्र. CAIM/PMU/२०१०-११/२८० दि.२८/०२/२०११ .

**प्रस्तावना-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (IFAD) या संस्थेच्या सहकार्याने विदर्भातील शेतक-यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या सहा जिल्हयांमध्ये समन्वयीत कृषि विकास प्रकल्प (C-AIM) राबविण्यात येत असून प्रकल्प दिनांक ४/१२/२००९ पासून कार्यान्वयीत झाला आहे. प्रकल्पांतर्गत तरतूदीप्रमाणे सन २०१०-११ करिता विभागीय प्रकल्प सुकाणू समितीने मंजूर केलेल्या वार्षिक कार्य नियोजन व अंदाजपत्रकाच्या (AWPB) अनुषंगाने, सन २०१०-११ मध्ये प्रकल्पांतर्गत हाती घ्यावयाच्या कामाकरिता (संस्थात्मक क्षमता विकास व भागिदारी, पणन साखळी आणि शाश्वत शेती आणि प्रकल्प व्यवस्थापन या घटकांवरील खर्च) प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा, अमरावती यांचेमार्फत निधी उपलब्ध करुन देणेबाबत प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. प्रकल्प संचालक, समन्वयीत कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांना समन्वित कृषि विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता सन २०१०-११ साठी रु. २,३५,९१,०००/- (रु. दोन कोटी पस्तीस लाख एक्क्याण्णव हजार फ़क्त) केंद्र शासनाच्या हिश्यातुन उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर निधी प्रकल्पाच्या पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.
मागणी क्र. व्ही-५,
मुख्य लेखाशीर्ष ६४२५, सहकारासाठी कर्जे
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना कर्जे
(०१)(१९), विदर्भातील आत्महत्याग्रस्त भागातील शेतक-याकरिता समन्वित कृषि विकास प्रकल्प (सी.ए.आय.एम.) (आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधीतुन कर्जे ) (बाह्य सहाय्य)
५५, कर्ज व आगाऊ रकमा
(६४२५-०६६-३ दत्तमत)

३. उपरोल्लिखित निधी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन त्याचे वितरण करण्यासाठी श्री. ना. ल. तडोसे, सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व श्री. य. गं. पाटील, कक्ष अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा "धनादेश/धनाकर्ष" MSAMB CAIM Programme PMU, Amravati या नावाने काढुन प्रकल्प संचालक, समन्वयीत कृषि विकास प्रकल्प, पी.एम.यू. अमरावती यांना देण्यात यावा व प्रकल्प संचालकांनी सदर "धनादेश/धनाकर्ष" प्राप्त झाल्याची पोच व त्याची मुद्रांकित पावती महाराष्ट्र शासनास पाठवावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या निधीचा विनियोग प्रकल्प अहवालाप्रमाणे ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी व प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांवरच करण्यात येत असल्याबाबत प्रकल्प संचालक, समन्वयीत कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

५. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०३७१/११/अर्थ-१३, दि.१९.०३.२०११ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९८/११/व्यय-२, दि.३०.०३.२०११अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०११०३२९१५३९०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं.आंडगे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रति:**

१. प्रधान सचिव (कृषि व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रकल्प संचालक (C-AIM) तथा विभागीय आयुक्त, अमरावती.
३. राज्य संपर्क अधिकारी, प्रकल्प अग्रणी यंत्रणा (C-AIM), महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
४. महालेखापाल,महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),मुंबई
५. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),नागपूर
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२/अर्थबळ/अर्थसंकल्प-१३),मंत्रालय,मुंबई.
९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, (१४१५), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (रोखशाखा / १७-स /२२-स / संगणक कक्ष) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
११. निवड नस्ती